








# संयुक्त वर्धापन सोहळा

## विशेषांक

### प्रमुख अतिथी - श्री. अशोक नायगांवकर

**दिनांक - २२ नोव्हेंबर २००९, वाशी**

# "e वर्ले अक्षर"

**<u>"काव्यांजली"</u>**, **<u>"मराठी कविता"</u>** आणि आपल्या सर्वांच आवडतं ई-साप्ताहिक **<u>"नेटाक्षरी"</u>** यांचा संयुक्त वर्धापन सौहळा दिनांक **२२ नोव्हेंबर २००९** या दिवशी वाशी येथील मॉर्डन कॉलेजच्या ऑडिटोरियममध्ये माननीय **<u>श्री. अशोक नायगांवकर सर</u>** आणि आमच्या सर्व रसिक प्रेक्षकांच्या उपस्थितीत सुंदर रित्या पार पडला. ह्या वर्धापन सोहळयाची कस्तुरी आम्हाला आमच्या त्या सर्व मित्र परिवाराला आणि चाहत्यांना वाटायची आहे जे ह्या सुंदर सोहळयाला उपस्थित राहू नाही शकलेत. म्हणून हा "वर्धापन सौहळा विशेषांक" खास आमच्या त्या सर्व रसिक मित्रांसाठी.... चला तर मग हवीय न ही कस्तुरी.... अगदी ठेवणीत जपुन ठेवा हं कारण हिच आठवांची कस्तुरी आपल्या सर्वांना अगदी आयुष्यभर पुरणार आहे....नव्हे तर आपल्या सर्वांचा क्षण न क्षण सुगंधित करणार आहे, सुखवुन जाणार आहे.

तुम्हाला माहिती आहे नोव्हेंबर महिना सुरु झाला आणि आमच्या इथे सगळयांना सेलिब्रेशनसचे वेध लागले. "मराठी कविता"ची ५ वर्षे, "काव्यांजली"ची २ वर्षे आणि सगळयांच्या लाडक्या "नेटाक्षरी"चा तर पहिला वहिला वाढदिवस. असा सुवर्ण योगायोग जुळून आला. मग धमालच होती, ठरलं मग हया तिघांचा वाढदिवस अगदी दणक्यात साजरा करायचा. कसा, कधी, कुठे, केव्हा हे मात्र कुणालाच माहिती नव्हतं. सगळयांची डोकी राजधानी एक्सप्रेसहूनही फास्ट धाऊ लागलीत. इतकी की प्रत्येकाकडे एकाहुन एक सरस सुंदर कल्पना होती. झालं मग ठरलं कि आपण ह्या वेळी आपल्याच पुरतें मर्यादित सेलिब्रेशन न करता हा आनंद सगळयांशी वाटायचा. मग काय ह्या अनोख्या संयुक्त वर्धापन सौहळयाच्या तयारीला आम्ही सर्व जण लागलों नाही अक्षरशः जुंपलों प्रत्येकाने झोकून दिलं स्वतःला ह्या सौहळयाच्या तयारीत......तुम्हाला माहिती आहे आम्ही ह्या सोहळयाचं बारसं सुद्धा केलं... **"e वर्ले अक्षर"**

# “e वर्ले अक्षर”

खरचं एखाद्या ताऱ्हुल्याचं करतात ना अगदी तसच किंबहुना त्याहुनही दणक्यात आम्ही हा सोहळा करण्याचे ठरविले. मग काय कामं आणि जबाबदा-या आम्ही सर्वांनी वाटुन घेतल्या. लहान मोठा, नवखा जुना सगळे अगदी हातात हात घालून कामाला लागले. आपल्या घरचाच सोहळा असला की कसे आपण कामाला लागतो ना तोच उत्साह, तोच आनंद, ती लगबग, ती धावपळ सर्वत्र ओसंडून वाहात होती. मग विचार केला की हा सोहळा अश्या व्यक्तिसमोर साजरा करायचा ज्यांचे सहज सुंदर शब्द, आपल्या सगळयांच्या आयुष्याला एक “हसरी चकाकणारी” किनार लावून जातात आणि क्षणार्धात नाव डोळयांसमोर आलं ते “श्री.अशोक नायगांवकरांच”. झालं मग काय विचारता नायगांवकर सरांचा होकार आल्यावर सगळयांच्या उत्साहाला काही पारावारच उरला नाही.

आमचा उद्देश्य अगदी सरळ आणि साधा होता. इंटरनेटवरील कविता, इथले कवि आणि कवयित्री, इथलं साहित्य जगासमोर आणणे. आमचं ई-साहित्य प्रतिष्ठान करत असलेलं काम जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोहचवणे. मग आमच्या कलाकार टिमने कार्यक्रमाची आखणी केली. काही निवडक कवितांचे काव्यवाचन, काही कवितांना सुंदर चाली लावून त्यांची गाणी बनवली. कलाकार टिम अगदी दिवस रात्रं कार्यक्रमाच्या तयारीत लागले. त्यांच्या त्या रिहर्सल्स, प्रक्टीस वाह!! किती मेहनत घेतली सर्वांनी आणि त्यांची ती मेहनत रंगली सुद्धा. कलाकार टिम तालमीत व्यस्त होती तर आमच्या क्रिएटिव्ह टिमने सोहळयासाठी खास लोगोज बनविलेत, निमंत्रणपत्रिका बनविल्यात, स्मृतिचिन्हे बनवलित, आमचे इतर सहकारी हॉल बुकिंग, जाहिरात, पोस्टर्स लावणे, वर्तमानपत्रात बातमी देणे ह्यात व्यस्त होते. सोहळयाची एकंदर पुर्वतयारी, लोकांचा उत्साह सोहळयाच्या यशाची हलकीशी नांदी देत होता. समाधान देत होता. एक तुम्हा सर्वांना इथे आवर्जुन सांगावेसे वाटतेय आणि ते हे की ह्या सर्वांनी आपापले उद्योगधंदे सांभाळून ह्या सोहळयाची तयारी आखणी केली.

# "e वर्ले अक्षर"

नवीन-जुन्या, हस-या सुन्न करणा-या आनंदी अश्या अप्रतिम काव्यरचना आमच्या कलाकारांनी सादर केल्या. त्यात देवीचे स्तुतीगाण होते, अभंग होते, प्रेमाचे तरल तराणे होते, झंझावातासारखे धार धार शब्द कमान होते आणि चक्क कार्पोरेट ऑव्या सुद्धा होत्या. काही क्षण निशब्द करुन गेले तर काही निखळ हसवुन गेले, काही क्षण पापण्या ऑलावुन गेले तर काही खसखस पिकवुन गेले. वेळ कसा पुढे सरकत होता ह्याचे भान मात्र कुणालाच नव्हते. रसिक प्रेक्षक हा आनंदी सोहळा याचि देही याचि डोळा अगदी शेवटपर्यंत पहात होते. तल्लिन झालेले सर्व.

आमच्या कलाकार मंडळींच्या रंगतदार, बहारदार काव्यवाचन आणि गायन संगिताच्या कार्यक्रमानंतर ई-साहित्य प्रतिष्ठान ने सर्व उपस्थित मान्यवरांचा, आयोजकांचा, कलाकारांचा, सर्व सहभागी, कवि-कवयित्रींचा, मराठी कविता, काव्यांजली आणि नेटाक्षरी च्या टिमचा सत्कार केला. ह्या सोहळ्यतील अभूतपुर्व घटना म्हणजे ई-बुक प्रकाशन. तुम्ही म्हणाल हे काय? पण जर ई-मेल असु शकतं ई-कॉमर्स असु शकतं तर मग ई-बुक का नाही. स्वस्त आणि सहज उपलब्ध असे हे ई-बुक. आपले मित्र श्री.आनंद माने (सोलापूर) ह्यांनी ई-बुक च्या माध्यमातून पुस्तकांच्या इतिहासात क्रांती घडवून आणली आणि एक नाही, दोन नाही तर चक्क चार चार ई-बुक्स प्रकाशित झाली.

- **टल्लीची शाळा – श्री. टल्लीभाय - मुंबई**
- **ग्रेव्हयार्ड लिटरेचर - श्री. प्राजक्त देशमुख – नाशिक**
- **त्रिवेणी - श्री. मकरंद सावंत - मुंबई**
- **चार शब्द (चारोळी संग्रह) – श्री.संतोष नार्वेकर - मुंबई**

खुद्द अशोक नायगांवकर सर ई-बुक हि संकल्पना पाहून चकित झाले. जग हे किती झपाट्याने पुढे चाललय...टेक्नॉलॉजी आणि इंटरनेटचा मराठी साहित्य जपण्यासाठी इतका योग्य आणि सुंदर रीत्या वापर केला जातोय हे पाहुन ते थक्क झाले आणि आनंदी हि !!!

ई साहित्य प्रतिष्ठान







ई-बुक
टल्लीची शाळा
*श्री टल्ली भाय*






ई-बुक
चार क्षण
(चारोळी संग्रह)
श्री. संतोष नार्वेकर





# ई-बुक क्रांती





ई-बुक
ग्रेव्हयार्ड लिटरेचर
श्री. प्राजक्त देशमुख





ई-बुक
त्रिवेणी
श्री. मकरंद सावंत








# “e वर्ले अक्षर”

कार्यक्रमाच आणखी एक आकर्षण म्हणजे आमच्या नेटाक्षरीच्या कुटुंबात नुकतच जन्माला आलेलं एक गोंडस बाळ आणि ते म्हणजे **“बालनेटाक्षरी”** हे एक नवीन ई-साप्ताहिक. खास बच्चापार्टीसाठी हे विशेष ई-साप्ताहीक आम्ही सुरु केलयं, ज्याच्या पहिल्या वहिल्या अंकाच प्रकाशन झालं ते श्री. अशोक नायगांवकर यांच्या हस्ते.









# “e वर्ले अक्षर”

कलाकार मंडळींच्या बहारदार काव्यवाचन, सुमधुर संगीताचा कार्यक्रम आणि सत्कार समारंभानंतर रंगमंच ताब्यात घेतला तो दस्तुरखुद्द श्री. अशोक नायगांवकर सरांनी, सर्व जण अगदी खिळून बसलेले आपआपल्या खुर्च्यांना. मग मात्र नायगांवकर सरांनी हास्याची जी चौफेर फुलबाजी सुरु केली अहाहा !!! खुसखुशीत खुमासदार किस्से, मुंबईकर आणि पुणेकरांतला फरक ज्या मिश्किल त-हेने त्यांनी सांगितला ना की विचारुच नका. हसून हसून आमची पुरती वाट लागली. बायका आणि पुरुष यांच्या स्वभावातील मुळ फरक ते विडंबनाचे काही गंमतीदार प्रसंग सर्व सर्व होतं नायगांवकर सरांकडे. ते इथेच थांबले नाहीत तर स्वःताच्या वैयक्तिक आयुष्यातील ही बरेचसे हसवणारे खसखस पिकवणारे किस्से त्यानी आम्हाला सांगितले. अस वाटत होतं जणु आम्ही सर्व जण त्यांच्याशी मनमोकळया गप्पाच मारत आहोत इतका माहोल त्यानी आपुलकीचा बनवला. मग काय ..... ना नायगांवकर सर थांबलेत आणि ना आम्ही थांबलोत.

ह्या सगळयात नायगांवकर सर आमच्या संपुर्ण ई-साहित्य चळवळीच, कलाकारांच कौतुक करायला नाही विसरलेत. काही सुचना दिल्या. एकंदरीत आमच्या संपुर्ण कार्यक्रमाबद्दल नायगांवकर सरांच्या तोंडुन वाह वाह च आली. जी आम्हा सर्वांना प्रचंड समाधान आणि ही ई-साहित्याची चळवळ सातत्याने नेटाने पुढे नेण्यासाठी निश्चितच बळ देउन गेली.


अविस्मरणीय क्षण....
नायगांवकर सर अस म्हणाले की
जापानी लोक कुणी खुप छान काम केल की
त्याला एक थंब देतात...
इथे ते मकरंद सावंतच्या निवेदनावर इतके खुष झालेले
की त्यानी एक नाही तर चक्क दोन थंब्स
त्याला शाबासकी म्हनुण दिलेत...
आणि हा अविस्मरणीय क्षण अगदी योग्य वेळी
अचूक टिपला तो आमच्या आनंद माने ह्यानी.....

